पंचायत समिती, समुद्रपूर (जि. वर्धा) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१६/प्र.क्र.१५५/बांधकाम-४

५ वा मजला, २५ मर्झबान पथ, बांधकाम भवन

फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१

तारीख : ३० मे, २०२३

**वाचा :-**

१) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा यांचे पत्र क्रमांकः** जिपव/काअ/बांध/शाअ/वशि-१७४१/२०१६, दिनांक ०१ जून, २०१६.

२) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा यांचे पत्र क्रमांकः** जिपव/बांध/तांशा/कअ-३/बानि-४५८/२०२२, दिनांक १६ नोव्हेंबर, २०२२.

**प्रस्तावना :-**

अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा यांनी वाचा मधील अनुक्रमांक १ व २ येथील पत्रांन्वये पंचायत समिती, समुद्रपूर (जि. वर्धा) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

०.२ पंचायत समिती, समुद्रपूर (जि. वर्धा) प्रशासकीय इमारत ही सन १९५८-५९ साली बांधून झालेली असून या इमारतीस ६४ वर्षे पूर्ण झालेली आहेत. सदरील जुनी इमारत लोडबेअरींग पद्धतीची बांधलेली आहे. छप्पर मंगलोरी कवेलूचे असून व्हरांड्यावर आर. सी. सी. स्लॅब आहे. सदर इमारतीचा बराचसा भाग जीर्ण झाला आहे. त्यामुळे प्रशासकीय कामकाज व ग्रामस्थांची मोठ्या प्रमाणात गैरसोय होते. पंचायत समिती, समुद्रपूर (जि. वर्धा) नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम समुद्रपूर येथील बांधकाम सर्व्हे क्रमांक ३८ मधील जिल्हा परिषदेच्या ताब्यात असलेल्या १०५१.३५ चौ. मी. या मोकळ्या क्षेत्रावर करण्याचे प्रस्तावित आहे. सदरची जागा जिल्हा परिषदेच्या ताब्यात आहे. पंचायत समिती, समुद्रपूर (जि. वर्धा) ही “क” वर्ग दर्जाची असून त्यांनी १०५१.३५ चौ.मी. इतक्या क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित केले आहे. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा यांनी पंचायत समिती, समुद्रपूर नवीन प्रशासकीय इमारतीकरिता उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, नागपूर यांच्या JOB NO. ३८४, DRG NO. ०३, ०४ व ०५ या नमुना नकाशावर आधारित, सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित रू.११८६.६१ लक्ष किंमतीचे सविस्तर

अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, वर्धा, अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांनी साक्षांकित केलेले आहे. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा यांनी प्रस्तावासोबत पंचायत समितीच्या ठरावाची प्रत, नमुना नकाशाची प्रत, लीड चार्ट, क्वॅरी चार्ट, ले-आऊट प्लॅन, साईट प्लॅन, स्थळ दर्शक नकाशा, अस्तित्वातील इमारत बांधकामाचे फोटो इत्यादी कागदपत्रे सादर केलेली आहेत.

०३. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती, पंचायत समिती, समुद्रपूर (जि. वर्धा) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.११८६.६१ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

पंचायत समिती, समुद्रपूर (जि. वर्धा) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रूपये ११,८६,६१,०००/- (रूपये अकरा कोटी शहाऐंशी लक्ष एकसष्ठ हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. प्रस्तुत बांधकामास तांत्रिक मान्यता देण्यापुर्वी संकल्पन तपासून घेणे आवश्यक राहील.
२. प्रस्तुत इमारतीचे बांधकाम मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा. बां. मंडळ, मुंबई यांच्याकडील विहित नमुना आराखड्यानुसार हाती घेण्यापूर्वी, स्थानिक नगररचना प्राधिकरणाची तसचे अग्निशमन यंत्रणेची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.
३. पंचायत समिती, समुद्रपूर (जि. वर्धा) प्रशासकीय इमारतीकरिता शासन निर्णय, सा. बां. वि. क्र. सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर/मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करून घेणे बंधनकारक राहील.
४. नियोजित आराखड्यात महिला पदाधिकाऱ्यासाठी प्रसाधनगृहासह विश्रांती कक्षाचे संकल्पन करण्यात येवून, सदर व्यवस्था इमारतीमध्ये निर्माण करण्यात यावी.
५. प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुवीजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:र्भरण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.
६. प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करून, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

७. या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

८. या कामी प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो संबंधित पंचायत समिती/जिल्हा परिषदेने सोसावा.

९. प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

१०.प्रत्यक्ष इमारतीचे बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग क्र.ईएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१/दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

०२. पंचायत समिती, समुद्रपूर (जि. वर्धा) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे.

| General Abstract For Construction of Samudrapur P. S. Administrative Building Dist. WARDHA | | |
|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | **Cost (In Rs.)** |
| **A** | **Essential items** | |
| 1 a) | Building Proper | 43069577.00 |
| | **Sub Total (a)** | **43069577.00** |
| b) | Biodigester | 300000.00 |
| c) | Furniture | 15000000.00 |
| | **Sub Total (1) = (a) +(b) + (b)** | **58369577.00** |
| 2 a) | Electrification | |
| | Internal 5 % of 1 (a) | 2153479.00 |
| | External 6 % of 1 (a) | 2584175.00 |
| b) | Fire Fighting | 2217600.00 |
| | **Sub Total (2) = (a) +(b)** | **6955254.00** |
| | **Sub Total (A) = (1) +(2)** | **65324831.00** |
| **B** | **Miscellaneous Civil Items** | |
| i | Compound wall | 1552563.00 |
| ii | Internal Road (CC) | 1348993.00 |
| iii | C C Drains | 1310932.00 |
| iv | Dismantailing | 500000.00 |
| v | Soil investigation & Detail land survey | 400000.00 |
| vi | Land Scaping / Gardening | 200269.00 |
| vii | Elevation treatment | 1500000.00 |
| | **Sub Total (B)** | **6812757.00** |
| | **Sub Total (A) + (B)** | **72137588.00** |
| **C** | **Optional Items** | |
| i | Audio Visual | 200000.00 |
| ii | Under ground water tank for R/W | 500000.00 |
| iii | Lifts | 2000000.00 |
| iv | External Toilet | 500000.00 |
| v | Generator 62.5 khv | 1760000.00 |
| vi | Supply charges of MSEDCEL (MSEB) | 100000.00 |
| vii | External area lighting | 500000.00 |
| viii | AC | 1275000.00 |
| ix | Transformer | 800000.00 |
| x | Solar roof top | 2000000.00 |
| xi | CCTV | 680000.00 |
| xii | any other electrical item | 840000.00 |
| | **Sub Total (B)** | **11155000.00** |
| | **Project Cost (P) = (A) + (B) + (C)** | **83292588.00** |
| **D** | **Other Provisions** | |
| 1 | Add cost of 4% Contingencies on (P) | 3331704.00 |

| General Abstract For Construction of Samudrapur P. S. Administrative Building Dist. WARDHA | | |
|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | **Cost (In Rs.)** |
| 2 | Add cost of 5% Green Building Concept on (a) | 4164629.00 |
| 3 | Add cost of 1.5% Computerization Charges on (P) | 1249389.00 |
| 4 | Add cost of 18% GST on (P) | 14992666.00 |
| 5 | Add cost of 1% Insurance on (P) | 832926.00 |
| 6 | Add cost of 10% Future hike in rate (P) | 8329259.00 |
| 7 | Add cost of 1.5% TS & TA Charges on (P) | 1249389.00 |
| 8 | Add cost for Quality control as per estimate | 56595.00 |
| 9 | Add cost for Royalty Charges | 329385.00 |
| 10 | Add cost of 1% SQM on (P) | 832926.00 |
| | **Sub Total (D)** | **35368668.00** |
| | **Total Cost the Project (TPC) = (P) + (D)** | **118661256.00** |
| | **Says in Rs.** | **11,86,61,000/-** |

०३. उपरोक्त बांधकामासाठी वाचा मधील अनुक्रमांक ३ येथील दिनांक १८ नोव्हेंबर, २०१९ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार निधीची मागणी Liability Register System (LRS) प्रणालीद्वारे करण्यात यावी व सदर परिपत्रकातील निर्देशानुसार, निधीच्या उपलब्धतेनुसार Liability Register System (LRS) प्रणालीद्वारे निधी वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

०४. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५३०१७५०२०५६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.05.30 18:25:07 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

४. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा.
७. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा.
८. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा.
९. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, वर्धा.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा वर्धा.
११. जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, वर्धा.
१२. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१३. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नागपूर विभाग, नागपूर.
१४. सभापती, पंचायत समिती, समुद्रपूर, (जि. वर्धा).
१५. गट विकास अधिकारी, पंचायत समिती समुद्रपूर, जिल्हा वर्धा.
१६. निवडनस्ती, कार्यासन बांध-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.